विशेष कार्यकारी अधिकारी पदावर केलेल्या नियुक्त्या संबंधित जिल्ह्यांच्या संकेत स्थळावर प्रसिध्द करुन त्या वेळोवेळी अद्ययावत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन,**
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक,क्रमांक: विकाअ-२०११/प्र.क्र.१७१/५
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक - ३१/३/२०११.

**पहा** : १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. विकाअ-२००७/४४०/प्र.क्र.१७४/०७/दि.२५.०७.२००७
२) शासन शुद्धीपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र. विकाअ-२००७/प्र.क्र.३८९/०७/५, दि.१५.०१.२००८

**शासन परिपत्रक**

२. विशेष कार्यकारी अधिकारी पदावरील नियुक्त्यांचे प्रस्ताव शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. विकाअ-२००७/४४०/प्र.क्र.१७४/०७, दि.२५.०७.२००७ व शासन शुद्धीपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र. विकाअ-२००७/प्र.क्र.३८९/०७/५, दि.१५.०१.२००८ मधील सूचनेनुसार जिल्हाधिका-यांकडून शासनाला प्राप्त होत नाहीत. असे प्रस्ताव शासन स्तरावर तपासताना त्यामध्ये ब-याच त्रूटी आढळून येतात. त्यामुळे शासन स्तरावरील कामकाजात विनाकारण वाढ होते व पर्यायाने विशेष कार्यकारी अधिकारी पदावरील नियुक्त्यांचे प्रस्ताव मा. मुख्यमंत्री महोदयांपर्यंत मान्यतेसाठी सादर करण्यास विलंब होतो असे निदर्शनास आले आहे.

३. प्रत्येक जिल्ह्यातील १००० मतदारामागे प्रत्येकी २ विशेष कार्यकारी अधिका-यांची नियुक्ती करावी असे प्रमाण/इष्टांक शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.विकाअ-२००७/प्र.क्र.३८९/५, दिनांक ७/३/२००८ अन्वये निश्चित करण्यात आले आहे. तसेच शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.विकाअ-२०१०/प्र.क्र.९८/५, दिनांक ३/९/२०१० अन्वये जिल्हानिहाय विशेष कार्यकारी अधिका-यांची संख्या सुधारित करण्यात आली असून

कोणत्याही परिस्थितीत प्रमाणक/इष्टांकाच्या संख्येपेक्षा जास्त विशेष कार्यकारी अधिका-यांच्या नियुक्त्या केल्या जाणार नाहीत याची दक्षता संबंधित जिल्हाधिका-यांनी घ्यावी अशा सूचना सर्व संबंधितांना देण्यात आलेल्या आहेत. विशेष कार्यकारी अधिकारी पदावर नियुक्त्या केलेल्या व्यक्तींच्या नावांची यादी महाराष्ट्र शासनाच्या तसेच संबंधित जिल्ह्याच्या संकेत स्थळावर (वेबसाईटवर) सर्वसामान्य जनतेला उपलब्ध व्हावी म्हणून सर्व जिल्हाधिका-यांनी त्यांच्या जिल्ह्याच्या संकेत स्थळावर प्रसिध्द करावी व ती यादी वेळोवेळी अद्ययावत करावी अशाही सूचना यापूर्वी सर्व जिल्हाधिका-यांना देण्यात आलेल्या आहेत. कांही जिल्हाधिका-यांनी अशा याद्या संकेत स्थळावर प्रसिध्द केलेल्या आहेत. परंतू, त्या अद्ययावत केलेल्या नाहीत. तर कांही जिल्हाधिका-यांनी अशा याद्या संकेत स्थळावर प्रसिध्दच केलेल्या नाहीत. अशा याद्या प्रसिध्द केल्या नसल्यामुळे सर्वसामान्य जनतेला त्याचा लाभ घेता येत नाही. पर्यायाने सर्वसामान्य जनतेस अशा क्षुल्लक कामासाठी देखील शासनाकडे धाव घ्यावी लागते. ही बाब गतिमान प्रशासनाच्या दृष्टीने योग्य नाही.

४. उपरोक्त सर्व बाबींचा विचार करून सर्व जिल्हाधिकारी यांना खालीलप्रमाणे पुन्हा सूचना देण्यात येत आहेत:

१. विशेष कार्यकारी अधिकारी पदावरील नियुक्त्यांचे प्रस्ताव शासनाला सादर करताना शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. विकाअ-२००७/४४०/प्र.क्र.१७४/०७/ दि.२५.०७.२००७ व शासन शुद्धीपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र. विकाअ-२००७/प्र.क्र.३८९/०७/५, दि.१५.०१.२००८ मधील सूचना विचारात घेऊन स्वयंस्पष्ट व परिपूर्ण प्रस्ताव शासन मान्यतेसाठी सादर करावेत.

२. ज्या विशेष कार्यकारी अधिका-यांचा विशेष कार्यकारी अधिकारी पदावरील नियुक्त्यांचा ५ वर्षाचा कालावधी संपुष्टात आला आहे, त्यांची नियुक्ती संपुष्टात येत असल्याचे आदेश तात्काळ निर्गमित करून त्यांचेकडील शासकीय दस्तऐवज परत घेणे व तसे शासनास कळविणे.

३. विशेष कार्यकारी अधिकारी पदावरील नियुक्त्यांचे आदेश प्रसृत केल्यावर त्यांची यादी तयार करुन महाराष्ट्र शासनाच्या राजपत्रामध्ये प्रसिध्द करावी व त्याची प्रत शासनाला सादर करावी.

४. विशेष कार्यकारी अधिकारी पदावरील नियुक्त्यांचे आदेश प्रसृत केल्यावर त्यांची **तालूकानिहाय** यादी तयार करुन महाराष्ट्र शासनाच्या तसेच संबंधित जिल्ह्याच्या संकेत स्थळावर (वेबसाईटवर) सर्व सामान्य जनतेला उपलब्ध व्हावी म्हणून सर्व जिल्हाधिका-यांनी त्यांच्या जिल्ह्याच्या अधिकृत संकेत स्थळावर ठळकपणे दिसेल असा स्वरुपात खालील प्रपत्रामध्ये प्रसिध्द करावी व ती यादी वेळोवेळी अद्यावत करावी.

**प्रपत्र.**

**विशेष कार्यकारी अधिकारी पदावरील नियुक्त्यांची माहिती.** जिल्हा -------

| अ. क्र. | विशेष कार्यकारी अधिकारी यांचे संपूर्ण नांव | निवासस्थानाचा पत्ता | संबंधित पोलिस ठाणे | विशेष कार्यकारी अधिकारी पदावरील नियुक्ती आदेशाचा क्रमांक व दिनांक | विशेष कार्यकारी अधिकारी पदावरील नियुक्तीचा दिनांक | विशेष कार्यकारी अधिकारी पदावरील नियुक्ती समाप्तीचा दिनांक |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |

५. प्रस्तुत शासन परिपत्रक, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध आहे. (संगणक संकेतांक २०११०३३११३२३३३००१)

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

सही/-

**( अ. द. जोशी )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

मा. राज्यपाल यांचे सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
उप मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२,
सर्व मंत्रालयीन विभागांचे अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,
सर्व विभागीय आयुक्त.
सर्व जिल्हाधिकारी.
पोलिस महासंचालक, मुंबई,
सर्व जिल्हा पोलिस अधीक्षक,
संग्रहासाठी / निवड नस्ती.